**महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका परिच्छेद- २०२ मधील तरतुदीनुसार निविदा मागविणे-**
**रू.५०.०० लक्षापेक्षा कमी किंमतीच्या निविदा सूचना नदीखोरे अभिकरणे (महामंडळे)/महासंचालक व शासनाच्या थेट अधिपत्याखालील मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता कार्यालयांच्या संकेतस्थळावर (वेबसाईटवर) प्रसिध्द करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र: वेबसा-२००९/(१४/०९)/सं.का.क.
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २८ /०४/२०११

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र: वेबसा-२००९/(१४/०९)/सं.का.क. दि.२९/५/२००९
२) सामान्य प्रशासन विभागाचा शासन निर्णय क्रमांक-मातंसं/नस्ती २०१०/प्र.क्र. ३४/३९ दि.०६.०८.२०१०

**प्रस्तावना:-**

संदर्भीय क्रमांक-२ च्या शासन निर्णयानुसार दि.०१/१०/२०१० पासून रू.२.०० कोटी व त्यापेक्षा अधिक किंमतीच्या निविदांसाठी तसेच दि.०१/१२/२०१० पासून रू.५०.०० लक्ष व त्यापेक्षा अधिक किंमतीच्या निविदांसाठी ई-निविदा कार्यप्रणाली वापरणे अनिवार्य केले आहे. तसेच नदीखोरे अभिकरणे (महामंडळे)/महासंचालक व शासनाच्या थेट अधिपत्याखालील मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता कार्यालयांनी, स्वतःची संकेतस्थळे विकसित केली असल्याने संदर्भीय क्रमांक-१ च्या शासन निर्णयामधील, अनुक्रमांक-१ प्रमाणे रू.५०.०० लक्षापेक्षा कमी किंमतीच्या निविदा सूचना संबंधीत कार्यालयाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करणे आवश्यक आहे. परंतु अद्याप कांही क्षेत्रिय कार्यालयांकडून रू.५०.०० लक्षापेक्षा कमी किंमतीच्या निविदा सूचना शासनस्तरावर ई-मेलव्दारे प्रसिध्दीसाठी पाठविण्यात येत आहेत. यास्तव संदर्भीय क्रमांक-१ चा शासन निर्णय अधिक्रमित करून रू.५०.०० लक्षापेक्षा कमी किंमतीच्या निविदा सूचना नदीखोरे अभिकरणे (महामंडळे)/महासंचालक व शासनाच्या थेट अधिपत्याखालील मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता कार्यालयांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करणे अनिवार्य आहे. त्या अनुषंगाने पुढील सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

संदर्भीय क्रमांक-१ चा शासन निर्णय अधिक्रमित करून रू.५०.०० लक्षापेक्षा कमी किंमतीच्या निविदांसाठी पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

१) रू.५०.०० लक्षापेक्षा कमी किंमतीच्या निविदा सूचना नदीखोरे अभिकरणे (महामंडळे) /महासंचालक व शासनाच्या थेट अधिपत्याखालील मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता कार्यालयांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करणे अनिवार्य करण्यात येत आहे. तसेच सदर कार्यालयाच्या संकेतस्थळाची लिंक जलसंपदा विभागाच्या www.mahawrd.org या संकेतस्थळाशी देणे आवश्यक आहे. येथून पुढे अशा निविदा सूचना महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात येणार नाही याची नोंद घ्यावी.

२) सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०११०४२८१११३२७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(रा. र. शहा)
शासनाचे उप सचिव

प्रत:-

महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र राज्य १/२, मुंबई/नागपूर,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य १/२, मुंबई/नागपूर,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृष्णा नदीखोरे अभिकरण, पुणे,
व्यवस्थापकीय संचालक, विदर्भ नदीखोरे अभिकरण, नागपूर,
व्यवस्थापकीय संचालक, तापी-खानदेश नदीखोरे अभिकरण, जळगांव,
व्यवस्थापकीय संचालक, गोदावरी मराठवाडा नदीखोरे अभिकरण, औरंगाबाद,
व्यवस्थापकीय संचालक, कोकण नदीखोरे अभिकरण, ठाणे,
महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षितता, मेरी, नाशिक
महासंचालक, जल व भूमि व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद,
सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,
सर्व अधिक्षक अभियंता, जलसंपदा विभाग,
सर्व अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,

सर्व अधीक्षक अभियंता आणि अधीक्षक अभियंता व प्रशासक यांना विनंती करण्यात येते की, उपरोक्त आदेश त्यांचे अधिपत्याखालील कार्यालयांच्या निदर्शनास आणावेत.

प्रत:- सर्व अधिकारी व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
संगणक कार्यक्रम कक्ष, (संग्रहार्थ).